# अँड्र्यु कार्नेगी

## वाचनालयाचे जनक



लेखक: चारमन सिमन
मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक

# अँड्र्यु कार्नेगी

## वाचनालयाचे जनक



लेखक: चारमन सिमन
मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक

**प्रकरण एक**

# वाचनालय दिवस

तुमच्या गावात वाचनालय आहे का? आपल्या गावात वाचनालय नाही अशी कल्पना देखील तुम्ही करू शकत नाही, हो ना? परंतु शंभरेक वर्षांपूर्वी अनेक शहरांमध्ये अथवा गावांमध्ये मोफत वाचनालय नव्हते. आवडीचे पुस्तक घरी वाचायला घेऊन येणे असे काही त्याकाळी नव्हतेच. श्रीमंत लोक तेवढे पुस्तके वाचत कारण पुस्तके विकत घेणे केवळ त्यांनाच शक्य होते.

अँड्र्यु कार्नेगी नावाच्या माणसाला मात्र वाटे की लोकांना पाहिजे तेव्हा पुस्तक वाचायला मिळायला हवे. पेन्सिल्वेनियामधल्या पिट्सबर्ग शहरात एका गरीब कुटुंबात त्यांचे पालन पोषण झाले. त्यावेळी म्हणजे १८५० च्या आसपास तिथे एकही वाचनालय नव्हते. पण पिट्सबर्ग मधे एक महाशय होते, जे नोकरी करणाऱ्या मुलांना आपल्या वाचनालयातील पुस्तके वाचायला देत.



त्या वाचनालयात जेव्हा अँड्र्यु पुस्तक घ्यायला जात तेव्हा त्यांना वेगळाच आनंद मिळे. त्यांच्यासाठी ती आयुष्यभरासाठी अनमोल आठवण होती. तसाच आनंद इतर मुलांनाही मिळावा असे त्यांना वाटे.



मोठेपणी अँड्र्यु कार्नेगी ह्यांची अमेरिकेतील मोजक्या अति धनाढ्य व्यक्तींमध्ये गणना होऊ लागली. परंतु गरीब मुलांना असणारी पुस्तकांची भूक मात्र ते कधीच विसरले नाही.

पुढे आपल्या आयुष्यभराची पूर्ण कमाई त्यांनी समाजासाठी दान केली. त्यातला बराच मोठा भाग जगभरातल्या अनेक शहरांमधे सार्वजनिक वाचनालये उघडण्यासाठी वापरला गेला. कदाचित हे पुस्तकही तुम्ही अँड्र्यु कार्नेगी वाचनालयातून आणले असेल.

तुम्ही जर हे पुस्तक सार्वजनिक वाचनालयातून आणले असेल तर त्यासाठी तुम्हाला कुठलेही पैसे द्यायला लागले नसतील. शाळा आणि रस्त्यांप्रमाणेच वाचनालयाचेही पैसे नागरिक कराच्या द्वारे भरतात. पण तुम्हा मुलांना जर जवळपासच्या वाचनालयातून पुस्तक आणायचे असेल तर एकही पैसा द्यावा लागणार नाही. (पुस्तक उशिरा परत दिले तर मात्र दंड भरावा लागतो) अमेरिकन वाचनालयाची सगळ्यात चांगली गोष्ट म्हणजे कुणालाही वाचनालयात जाता येते.

## वाचनालयातून पुस्तक कसं आणायचं?



**तुम्ही हे पुस्तक कुठल्या सार्वजनिक वाचनालयतून घेऊन आला आहात का? हो नं? म्हणजे तुम्हीही दरवर्षी वाचनालयाचा वापर करणाऱ्या लाखो अमेरिकन लोकांप्रमाणे एक आहात. विद्यार्थी, पालक, शिक्षक, छोटी मुलं असे कुणीही हवं ते पुस्तक वाचनालयातून घेऊन येऊ शकतात. तुम्हाला तुमचं नाव लिहिता येऊ लागलं की लगेच तुम्ही वाचनालयाचे सभासद होऊन तुमच्या नावाचं कार्ड बनवून घेऊ शकता. त्या कार्डवर हवं तेव्हा आणि हवं ते पुस्तक मिळू शकतं. बस फक्त आपल्या आवडीचं पुस्तक निवडायचं, कार्ड दाखवायचं आणि वाचण्यासाठी घरी घेऊन यायचं.**

## प्रकरण दोन

# डनफर्मलाइनमधील बालपण

अँड्र्यु कार्नेगी ह्यांचा जन्म २५ नोव्हेंबर १८३५ मधे स्कॉटलंडजवळील डनफ़र्मलाइन नावाच्या एका छोट्या शहरामध्ये झाला. अँड्र्युचे वडील विल्यम कार्नेगी विणकर होते. डनफ़र्मलाइनमधील इतर विणकरांसारखेच तेही हातमागावर कपडे विणत. तेथील सर्व विणकर अतिशय सुंदर टेबल क्लोथ शिवायचे. तिथले टेबल क्लोथ जगभरात प्रसिद्ध होते.

औद्योगिक क्रांतीचा प्रसार वाढल्याने १८३५ मध्ये पैसे कमावणे तेवढे सहज नव्हते. हातामागापेक्षा कारखान्यांमध्ये यंत्रांवर मोठ्या प्रमाणावर स्वस्त कापड तयार करणे सोपे झाले होते.



**डनफर्मलाइन, स्कॉटलंड मधील अँड्र्यु कार्नेगी ह्याचे जन्मस्थान आता संग्रहालयाच्या रुपात जतन केले आहे.**

## औद्योगिक क्रांती

अठराव्या शतकामधे इंग्लंडमधे औद्योगिक क्रांतीची सुरुवात झाली. औद्योगिक क्रांतीच्या आधी बहुतांश लोक छोट्या गावांमध्ये राहून शेतीवर गुजराण करत होते. विल्यम कार्नेगीसारखे कुशल कारागीर पोटापाण्यासाठी घरातच हस्तव्यवसाय चालवत. परंतु औद्योगिक क्रांती झाल्यामुळे वाफेवर अथवा इतर इंधनावर चालणारी यंत्र मोठ्या प्रमाणावर वापरायला सुरुवात झाली. या यंत्रांवर काम करण्यासाठी लोकांचे लोंढे गावातून शहरात येऊ लागले. विणकर आणि इतर अनेक कुशल कामगारांनी हाताने केलेल्या वस्तूंपेक्षा यंत्रावर बनवलेल्या वस्तू खूप स्वस्त असल्याने त्यांचा रोजगार गेला.



औद्योगिक क्रांतीमुळे कारखान्यात मोठ्या प्रमाणात स्वस्त वस्तू बनू लागल्या.

अँड्र्यु कार्नेगीच्या वडीलांना कळून चुकले की डनफर्मलाइनमधे कुटुंबियांचे पालनपोषण करणे शक्य नाही आहे. शहरातील नवीन कापड गिरणी खूप मोठ्या प्रमाणावर कापड बनवू लागली होती. हातमागावरच्या कपड्यापेक्षा हे खूप वेगाने बनत होते आणि किंमतही खूप कमी होती. मोठ्या कष्टाने त्यांनी आपल्या कुटुंबियांसह स्कॉटलंड सोडायचा निर्णय घेतला. त्यांना आशा वाटत होती की अटलांटिक महासागरच्या पलीकडील “संधीचा प्रदेश” म्हणून ओळखली जाणारी अमेरिका आयुष्यात सुख आणेल.

## प्रकरण तीन

# नव्या भूमीवरील साहसे

अँड्र्यु कार्नेगी आणि त्यांचे कुटुंबीय अमेरिकेत पिट्सबर्ग, पेन्सिल्वेनिया इथे राहायला आले. अँड्र्युच्या दोन मावश्या आधीपासून पिट्सबर्गला राहत होत्या. तसेच स्कॉटलंडवरूनही भरपूर लोक इकडे स्थायिक झालेले होते. त्यामुळे कार्नेगी परिवाराला नवीन ठिकाण घरच्यासारखे वाटत होते.



१८५० - पिट्सबर्ग, पेन्सिल्वेनिया

### पिट्सबर्ग, पेन्सिल्वेनिया

पिट्सबर्ग पेन्सिल्वेनियाच्या नैऋत्येकडील एक भाग आहे. तिथे अल्लेघ्नी आणि मोनोंगहेला नद्यांचा संगम होऊन ऑहियो नदी उगम पावते. आता पिट्सबर्ग हे स्टील उत्पादनाचे जगातील सर्वात मोठे केंद्र आहे. इथली लोकसंख्या वीस लाखाहून अधिक आहे.



विल्यम कार्नेगीनी वेळ न दवडता लगेचच हातमाग सुरु केला. पण इथेही कारखान्यात बनवलेल्या वस्तू हाताने बनवलेल्या वस्तूंपेक्षा कितीतरी स्वस्त किंमतीत उपलब्ध होत्या हे त्यांनी पाहिले. अमेरिकेत आणि स्कॉटलंडमधे काम करणे ह्यात काहीही फरक नव्हता. त्यांचे फारच कमी टेबलक्लोथ विकले जात होते त्यामुळे ते खूप निराश झाले.



**पेन्सिल्वेनियामधे स्थायिक झाल्यावर विल्यम कार्नेगीना कळलं की कारखान्यात बनवलेल्या वस्तूंना हातांनी केलेल्या वस्तूंपेक्षा जास्त मागणी आहे.**

कार्नेगी परिवार पिट्सबर्गला राहायला आले तेव्हा अँड्र्यु कार्नेगी बारा वर्षांचे होते. त्याकाळी बारा वर्षांची मूले-मुली काम करून आपल्या कुटुंबियांना हातभार लावायचे. अँड्र्युलाही लवकरच कापड गिरणीत नोकरी मिळाली. कामाचे तास जास्त आणि कष्ट भरपूर. त्यासाठीचा पगार मात्र कमी. आठवडाभर काम केले की त्याचे फक्त १.२० डॉलर मिळायचे. तरीही अँड्र्यु कार्नेगी खुश होते कारण ही त्यांची पहिलीच कमाई होती.

औद्योगिक क्रांतीमुळे विल्यम कार्नेगी हतबल झाले होते. परंतु किशोरवयीन अँड्र्युचा स्वभाव मात्र खूप उत्साही होता. एकोणिसाव्या शतकाच्या मध्याला अमेरिकेत वेगाने प्रगती होऊ लागली होती. टेलीग्राफ आणि रेल्वेसारख्या नवीन शोधांमुळे अँड्र्युसारख्या साहसी, बुद्धिमान आणि मेहनती मुलांना अनेक उत्तम संधी खुल्या झाल्या होत्या.

टेलीग्राफ कार्यालयामधे मेसेंजरची नोकरी ही अँड्र्युला मिळालेली पहिली मोठी संधी. अँड्र्युनी ताबडतोब ही नोकरी स्वीकारली. त्यांना वाटले की समाजातील मान्यवर लोकांना तार पोचवण्याचे काम हे कळकट्ट गिरणीत अति कष्टाचे काम करण्यापेक्षा कधीही चांगले.



**एकोणिसाव्या शतकाच्या मध्याला बारा वर्षांची मुले नोकरी करून आपल्या कुटुंबाला हात्भात लावत. अँड्र्यु कार्नेगीही ह्या मुलासारखेच टेलीग्राफ कंपनीमधे संदेश पोचवण्याचे काम करीत.**

## टेलीग्राफ म्हणजे काय?

**टेलीग्राफचा शोध सॅम्युअल मोर्सनी सन १८३७ मधे लावला. ह्याला दूरतारी संदेश असेही म्हणतात. ह्या यंत्राद्वारे लांबच्या अंतरावर रेडियो किंवा तारांच्या द्वारे संदेश पाठवता येतो. ह्यासाठी वापरल्या जाणाऱ्या लिपीला “मोर्स कोड” म्हणतात.**

पिट्सबर्गमधे लोक अँड्र्युला ‘यंग अँडी’ ह्या नावाने ओळखत. अँड्र्यु खूप मेहनती आणि बुद्धिमान होते. अल्पावधीतच त्यांना पिट्सबर्गचे सर्व रस्ते तोंडपाठ झाले. त्यांनी संदेश पोचवण्यासाठी सर्वात जलद मार्ग शोधून काढले. टेलीग्राफ यंत्रावर संदेश पाठवणे आणि आलेले संदेश नोंदवून घेणे हे काम ते लगेच शिकले. लवकरच त्यांची टेलीग्राफ ऑपरेटर म्हणून बढती झाली.

टेलीग्राफ कार्यालयात काम करत असताना त्यांना पिट्सबर्गमधील अनेक प्रसिद्ध व्यावसायिकांना भेटण्याची संधी मिळाली. त्यापैकीच एक होते थॉमस स्कॉट. ते पेन्सिल्वेनिया रेलरोड कंपनीच्या पश्चिम विभागाचे वरिष्ठ अधिकारी होते. मिस्टर स्कॉटना अँड्र्युचा उत्साह, ऊर्जा




संदेश मोर्स कोडमध्ये टेलिग्राफमार्फत पाठवला जाई आणि प्रशिक्षित कर्मचारी त्याचे शब्दांमध्ये रुपांतर करत.

आणि महत्वाकांक्षी स्वभाव खूप आवडला. अँड्र्युच्या कामाने ते इतके प्रभावीत झाले की त्यांनी अँड्र्युला आपला खाजगी सचिव होण्याबाबत विचारले.



**अमेरिकेत वेगाने रेल्वेमार्ग पसरत होते त्यामुळे पश्चिमेकडच्या लोकांना प्रवास, दळणवळण आणि रोजगार सहज सोपे झाले.**

अँड्र्यु कार्नेगीसाठी ही खूपच आश्चर्यजनक पण मोठी संधी होती. अमेरिकेच्या प्रगतीतले रेल्वेचे मोठे आणि महत्वाचे योगदान ते पाहत होते. त्याकाळी युरोपमधील लोक मोठ्या संख्येने अमेरिकेत स्थलांतर करत होते. त्यातील काही जणांनी कारखान्यात नोकरी मिळवली आणि ते पूर्वेकडे स्थायिक झाले. तर काही जण टेम्पोमधून पश्चिमकडे स्थायिक व्हायला गेले. पश्चिमेत स्थायिक झालेल्यांना पूर्वेकडील कारखान्यात तयार झालेल्या वस्तूंची गरज होती. तर पूर्वेकडच्या कारखान्यांना पश्चिमेकडच्या कच्च्या मालाची आवश्यकता होती. लाकूड, तेल, दगड इ. कच्चा माल वापरून पक्का माल तयार होत असे. ह्या कच्च्या मालाची आणि तयार वस्तूंची पूर्व-पश्चिम भागामधे देवाण-घेवाण कशी करायची? तर ह्यासाठी रेल्वेमार्ग हाच पर्याय आहे हा पूर्ण विश्वास अँड्र्यु कार्नेगीना होता.

थॉमस स्कॉटसाठी १८५३ मध्ये अँड्र्यु कार्नेगीनी काम करायला सुरुवात केली. त्यावेळी ते केवळ सतरा वर्षांचे होते. अमेरिकेत येऊन त्यांना चारेक वर्षच झाली होती आणि ते आता महिन्याला पस्तीस हजार डॉलर कमवीत होते. १८५९ साली थॉमस स्कॉट पेन्सिल्वेनिया रेलरोड कंपनीचे व्हाईस प्रेसिडेंट झाले. आता अँड्र्यु कार्नेगीची त्यांच्या जागी पश्चिम डिव्हीजनचे सुपरिन्टेन्डेन्ट म्हणून नियुक्ती झाली. त्यावेळी त्यांचे वय फक्त चोवीस वर्षे होते.

## नागरी युद्ध

**१८६१ ला सुरु झालेले नागरी युद्ध् १८६५ मध्ये समाप्त झाले. दक्षिणेकडील (कॉन्फेडरेट) राज्यांना गुलाम ठेवण्याचा आपला हक्क अबाधित ठेवायचा होता. आपली शेतीप्रधान जीवन पध्दती अखंड सुरु राहावी ह्यासाठीही त्यांचा झगडा चालू होता. उत्तरेच्या (यूनियन) राज्यांना मात्र गुलामगिरीची प्रथा बंद करायची होती.**

**अँड्र्यु कार्नेगीनी सिविल वॉरमधे सहभागी नव्हते. परंतु टेलीग्राफ आणि रेल्वेमार्गाच्या व्यवस्थेसाठी त्यांनी जे काम केले ते उत्तरेच्या राज्यांच्या विजयासाठी मोठे योगदान होते. टेलीग्राफमुळे राष्ट्राध्यक्ष लिंकन शेकडो मैल दूर असेलेल्या आपल्या सैनिकांबरोबर संपर्कात राहू शकले. रेल्वेमुळे सैनिक आणि सामानाची ने-आण घोडे आणि बग्गीपेक्षा सुलभ आणि वेगवान झाली.**



अँड्र्यु कार्नेगीसाठी ही खूपच मोठी पदोन्नति होती. त्यांनी पिट्सबर्गला एक आलिशान घर घेतले. तिथे ते आई आणि टॉम ह्या आपल्या सोळा वर्षाच्या भावाबरोबर राहू लागले. अँड्र्युला एकच दु:ख होते की त्याचे हे यश पाहायला वडील जिवंत नव्हते.

१८६१ मध्ये नागरी युद्ध् सुरु झाले तेव्हा थॉमस स्कॉट आणि अँड्र्यु कार्नेगी वाशिंगटन डी.सी. इथे युनियन फौजेच्या मदतीला आले. पूर्ववत आणि सुरळीत रेल्वेमार्ग आणि टेलीग्राफ व्यवस्था चालू ठेवण्याची जबाबदारी त्यांच्यावर होती. अँड्र्युसमोर हे चांगलेच आव्हानात्मक काम होते पण आव्हाने घ्यायला त्यांना आवडे.

नागरी युद्ध १८६५ साली समाप्त झाले. तोपर्यंत अँड्र्यु कार्नेगीने पेन्सिल्वेनिया रेलरोड कंपनीसाठी काम केले. त्यानंतर रेलरोडच्या नोकरीचा राजीनामा देऊन त्यांनी सगळ्यांना धक्का दिला. पण त्यांनी आणखी नवीन आव्हाने घेण्याचे ठरवले होते.

# आगामी योजना

पेन्सिल्वेनिया रेलरोड कंपनीतील नोकरीबरोबरच आणखीन पैसे मिळवण्यासाठी अँड्र्यु कार्नेगींनी इतरही कामे केली. उदा. सर्व भागात रेल्वेचे रूळ टाकण्याचे काम झपाट्याने चालू होते ते अँड्र्यु पाहत होते. त्यामुळे लोकांना ट्रेनमधून एका टोकाहून दुसऱ्या टोकाकडे जाणे सोपे आणि सहज शक्य झाले होते. लांबच्या प्रवासाला काही दिवस लागत. इतका मोठा प्रवास लोक बसून करतील हे अँड्र्युना जरा कठीण वाटत होते. म्हणून जेव्हा त्यांना एक कंपनी रेल्वेत झोपता येईल अशी बाके बनवत आहे हे कळले तेव्हा त्याबद्दल त्यांना फारच उत्सुकता वाटली.



लांबच्या प्रवासासाठी ट्रेनची लोकप्रियता खूप वाढली. त्यामुळे अँड्र्युनी प्रवाश्यांना झोपून प्रवास करता येईल अशी बाके बनवण्याऱ्या कंपनीमध्ये गुंतवणूक केली.



यूनियन पॅसिफिक रेलरोड आणि सेंट्रल पॅसिफिक रेलरोड कंपनीचे रेल्वेरूळ “प्रोमॉटरी समिट” युटाह इथे एकत्र जोडले गेले तेव्हाचा क्षण.

## ट्रान्सकॉटिनेंटल रेलरोड

साधारण १८६० च्या आसपास अमेरिका झपाट्याने वाढत होती. तेव्हा प्रवासासाठी ट्रेनची लोकप्रियता चांगलीच वाढली होती. त्यामुळे राष्ट्राध्यक्ष अब्राहम लिंकननी देशाच्या प्रगतीसाठी पूर्व-पश्चिम रेल्वेमार्गाचा विस्तार करण्याचे ठरवले. १८६२ साली अब्राहम लिंकननी रेलरोड कायद्यावर स्वाक्षरी केली. त्याद्वारे दोन कंपन्यांना ट्रान्सकॉटिनेंटल रेल्वेमार्ग बांधण्यासाठी परवानगी मिळाली. यूनियन पॅसिफिक रेलरोड कंपनीने पश्चिमेला ओमाहा, नेब्रास्कापासून आणि सेंट्रल पॅसिफिक रेलरोड कंपनीने पूर्वेला साक्रामेंटो, कॅलिफोर्नियापासून रेल्वेमार्ग बांधायला सुरुवात केली. “प्रोमॉटरी समिट” युटाह येथे १० मे १८६९ रोजी दोन्ही बाजूचे रूळ जोडण्यात आले.

नागरी युद्धात अब्राहम लिंकन पूर्णतः गुंतले गेले होते तरीही अमेरिकेची प्रगती कशी साधता येईल ह्याचा ते सतत विचार करायचे.



अँड्र्यु कार्नेगींनी रेल्वेच्या डब्यात झोपून प्रवास करता येतील अशी बाके बनवण्याऱ्या कंपनीमध्ये पैसे गुंतवण्याचा निर्णय घेतला. ही बाके विकली गेली की त्यातून अँड्र्युना पैसे मिळत. ह्या प्रकारच्या बाकांना लवकरच मोठी मागणी येईल आणि त्यातून आपल्याला भरपूर पैसा मिळेल असा अँड्र्युचा अंदाज होता. आणि तो अगदी बरोबर ठरला.

ह्या व्यवसायातून मिळणारे भांडवल अँड्र्युनी दुसऱ्या उद्योगधंद्यामध्ये गुंतवायला सुरुवात केली. रेल्वेतच नोकरी करीत असल्याने रेल्वेचे लाकडी पूल आग लागली तर जळून जातात किंवा पुराच्या पाण्यात वाहून जातात हे ते जवळून पाहत होते. त्याऐवजी लोखंडी पूल जास्त सुरक्षित आणि भक्कम आहेत हे त्यांना कळले. म्हणून त्यांनी किस्टोन ब्रिज कंपनी सुरु केली. संपूर्ण अमेरिकेत ह्या कंपनीने ब्रिज बांधण्याचे काम केले आणि त्यातून अँड्र्युनी भरपूर पैसे कमावले.

अँड्र्यु कार्नेगींनी खनिजतेल विहिरींमध्येही गुंतवणूक केली. औद्योगिक क्रांती होण्याआधी कुणी खनिज तेलाचा फारसा वापर करीत नव्हते. पण अँड्र्युना माहित होते की नव्याने सुरु झालेल्या कारखान्यांतील यंत्रांना खनिज तेलाच्या इंधनाची गरज पडणार आहे. त्यांनी पेन्सिल्वेनिया आणि ओहिओमधील खनिज तेलाच्या विहिरी खरेदी करायचा सपाटा लावला. आणि थोड्या काळातच त्यांनी ह्यातून अफाट पैसा मिळवला.

## खनिज तेल

१८५९ मध्ये एडविन डार्कनी पहिली खनिज तेल विहीर तितूस्वील्ले, पेन्सिल्वेनिया येथे खणली. तेव्हापासून अमेरिकेत कच्च्या तेलाचे उद्योग सुरु झाले. आज अमेरिकेतल्या जवळपास सगळ्या खनिज तेलाच्या विहिरी टेक्सास, अलास्का आणि कॅलिफोर्निया इथे आहेत. आज तेल हे जगातील सर्वात जास्त मागणी असलेले नैसर्गिक इंधन आहे. खनिज तेल हे खाणींमधे म्हणजेच पृथ्वीच्या खोल पृष्ठभागात आढळते. गाड्या, ट्रक, ट्रेन, ट्रक्टर इ. अनेक वाहनासाठी पेट्रोल, डिझेल हे खनिज तेल लागते. वीज आणि भट्टीसाठी काही घरात, उद्योगधंद्यात आणि कारखान्यात खनिज तेल वापरले जाते.

अँड्र्यु कार्नेगीनी धाडसी निर्णय घेतले त्यामुळेच ते इतक्या कमी वेळात यशस्वी उद्योजक होऊ शकले. कुठले उद्योग, नवीन शोध अथवा वस्तू आगामी काळात लोकप्रिय होतील ह्याचा ते अंदाज घ्यायचे आणि त्यानुसार त्यात ते आपल्याकडील भांडवल गुंतवायचे.

प्रत्येक वस्तू बिनचूक बनण्याकडे अँड्र्यु कार्नेगीचा कटाक्ष असायचा. कामातील चांगली गुणवत्ता हेही त्यांच्या यशाचे कारण होते. प्रत्येक प्रकल्पात ते जातीने लक्ष घालीत. काम करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीनेही आपल्याप्रमाणे काम करावे अशी त्यांची अपेक्षा असे. उदा. अँड्र्यु कार्नेगीनी लोखंडी ब्रिज बांधायची कामे जेव्हा सुरु केली तेव्हा त्यांच्या लक्षात आले की उत्तम प्रतीच्या लोखंडासाठी स्वतः त्याची निर्मिती केली तरच ते पूर्ण खात्रीलायक असेल. म्हणून त्यांनी लोखंड बनवणारे कारखाने खरेदी केले. आता त्यांना चांगल्या गुणवत्तेचे लोखंड सहजी उपलब्ध करता येणार होते.

लोखंडाच्या उत्पादनासाठी किती खर्च येतो ह्याकडे त्यांची बारीक नजर असे. बऱ्याचशा कारखानदारांना आपल्याला नफा होतो आहे की तोटा हे वर्षाच्या शेवटी जेव्हा हिशोब व्हायचा तेव्हाच कळायचे. अँड्र्यु कार्नेगींच्या बाबतीत मात्र असे कधी घडले नाही. एकही पैसा अथवा कच्चा माल अजिबात वाया जाणार नाही अशी कामाची पध्दत त्यांनी अंमलात आणली.

१८६५पर्यंत त्यांनी इतका प्रचंड पैसा कमावला की त्यांनी रेलरोडच्या नोकरीचा राजीनामा दिला. त्यांना इतर कुणाकडे नोकरी करण्याची गरज नव्हती. असेही स्वत: मालक होण्याचीच त्यांची इच्छा होती. आपल्या आत्मचरित्रामध्ये त्यांनी लिहिले आहे, “माझे भविष्य मला स्वत: घडवायचे होते. आज मला जे समाधान आहे ते रेलरोड कंपनीने कितीही पगार दिला असता तरी मिळाले नसते. म्हणून मी पगारासाठी काम करणे सोडून दिले.”

पेन्सिल्वेनिया रेलरोड कंपनी सोडल्यानंतर अँड्र्युनी पिट्सबर्गहून न्यूयॉर्कला राहायला जाण्याचा निर्णय घेतला. न्यूयॉर्क देशाची आर्थिक राजधानी होती. देशातल्या सर्वात मोठ्या वित्तीय संस्था आणि बँका न्यूयॉर्कमध्ये होत्या. अँड्र्यु आता प्रचंड भांडवल असलेल्या कंपन्यांचे मालक होते त्यामुळे अनेक बँका जवळ असणे त्यांच्या दृष्टीने महत्वाचे होते. पिट्सबर्गमधील कारखान्याचा कारभार त्यांनी टॉमला आपल्या भावाला चालवायला दिला.

अँड्र्यु कार्नेगींचे वास्तव्य पिट्सबर्गला जरी नसले तरी तिथल्या लोखंडाच्या कारखान्यामधले त्यांचे लक्ष अजिबात कमी झाले नाही. उत्तम कामगार आणि चांगली कामे मिळावीत ह्यासाठी ते स्वतः लक्ष देत. चांगल्या गुणवत्तेच्या लोखंड निर्मितीसाठी ते नवनवीन पध्दती जाणून घ्यायचे.

देशभरातील बांधकामासाठी निव्वळ उत्तम प्रतीचे लोखंड असणे पुरेसे नव्हते. स्टील हे लोखंडापेक्षा जास्त मजबूत आणि सोयीचे होते. म्हणून अँड्र्युनी स्टीलचे अत्याधुनिक आणि अवाढव्य कारखाने अमेरिकेत सुरु

करायचे ठरवले. 'एडगर थॉमसन स्टील वर्क्स' ह्या नावाने त्यांनी हा नवीन व्यवसाय पिट्सबर्गच्या बाहेरील भागात उभारला.

या कारखान्यांच्या समूहामध्ये नंतर आणखी अनेक कारखान्यांची भर पडली. कारखान्यांच्या वाढत्या संख्येबरोबर नफाही वाढू लागला. १८९० साल उजाडले तेव्हा अँड्र्यु कार्नेगीच्या योगदानामुळे पिट्सबर्ग हे स्टील आणि लोखंड उत्पादनामध्ये देशातील अव्वल शहर बनले होते. तब्बल पंधरा हजाराहून अधिक लोकं 'कार्नेगी स्टील कंपनी' मध्ये काम करत असत.

एक सज्जन आणि प्रामाणिक गृहस्थ अशी अँड्र्यु कार्नेगी यांची ख्याती होती. कामगारांना ते आदराची वागणूक देत. अन्य उद्योजकांएवढाच पगार ते आपल्या कामगारांना देत.



एडगर थॉमसन स्टील वर्क्स, पिट्सबर्ग, पेन्सिल्वेनिया



मोठ्या बँकांच्या जवळ असावे या हेतूने अँड्र्यु कार्नेगी पिट्सबर्गहून न्यूयॉर्क शहरात राहायला आले.

परंतु १८९२ मध्ये कार्नेगीच्या ‘होमस्टेड स्टील वर्क्स’ मधील कामगारांनी संप पुकारला. वेतनवाढ दिल्याशिवाय कामावर रुजू होण्यास त्यांनी नकार दिला. या संपामुळे अँड्र्यु कार्नेगीच्या नावलौकिकाला तडा गेला.



**कार्नेगी स्टील कंपनी**

## होमस्टेड स्टील कामगारांचा संप

**अँड्र्यु कार्नेगी स्कॉटलंडच्या दौऱ्यावर गेले असताना कंपनीतल्या कामगारांनी संप पुकारला. होमस्टेड स्टील वर्क्सच्या मॅनेजरने संपकऱ्यांवर जरब बसावण्यासाठी सशस्त्र पोलिसांना पाचारण केले. त्यामुळे वातावरण चांगलेच तापले. त्यानंतर झालेल्या चकमकीत १८ लोक मारले गेले तर अनेकजण जखमी झाले. अमेरिकेतील कारखानदार आणि कामगार ह्यांच्यातील हा संघर्ष सर्वात टोकाचा ठरला.**



## प्रकरण पाच

# दानधर्म

१९०० सालामध्ये कार्नेगी स्टील कंपनीची वार्षिक कमाई चार कोटी डॉलरच्या वर पोहचली होती. एक व्यावसायिक म्हणून अँड्र्यु कार्नेगी यशाच्या शिखरावर होते. तेव्हा जीवनात नवीन वळण घेण्याची हीच ती वेळ आहे असे त्यांनी ठरवले. जानेवारी १९०० मध्ये अँड्र्युनी लोखंड आणि स्टीलच्या उद्योगाचे संपूर्ण साम्राज्य पंचवीस कोटी डॉलरला विकले. तेव्हा ते पासष्ट वर्षाचे होते आणि तीनशे कोटी डॉलरचे मालक होते, उर्वरित आयुष्यात त्यांनी ही सारी संपत्ती समाजाला दान करून टाकली.

धनाढ्य लोकांनी आपली कमाई स्वत:वर खर्च न करता चांगल्या कामासाठी पैसे दान करून समाजाला मदत केली पाहिजे असे अँड्र्यु कार्नेगी ह्यांचे विचार होते. काही श्रीमंत लोक कुठलाही दानधर्म न करता मरण पावतात हे त्यांना बिलकुल मान्य नव्हते.




**अँड्र्युच्या समाजपयोगी योगदानातील 'कार्नेगी टेक्निकल स्कूल' - जिथे विद्यार्थी विज्ञान, अभियांत्रिकी आणि व्यावसायिक कौशल्ये शिकत होते.**

अँड्र्यु कार्नेगीच्या मते लोकांचे अपुरे शिक्षण हे विश्वातील अनेक समस्यांचे मूळ होते. आयुष्यभर पुस्तके वाचून आणि सुशिक्षित लोकांशी चर्चा करून अँड्र्युची शिकण्याची प्रक्रिया निरंतर चालू होती. आपल्याला कॉलेजला जाता आले नाही ह्याचे त्यांना खूप वाईट वाटे. त्यामुळे देशभरातील शाळा व कॉलेजना त्यांनी भरघोस देणग्या दिल्या.

अँड्र्यु कार्नेगीनी तुटपुंजे उत्पन्न असलेल्या सेवानिवृत्त कामगारांना आर्थिक मदत केली. शांततेसाठी काम करणाऱ्या जगभरातल्या संस्थाना त्यांनी आर्थिक पाठींबा दिला. त्यांनी “हिरो फंड” स्थापन केला ज्याद्वारे ते सामान्य लोकांनी केलेल्या असामान्य कामाचा गौरव करत. असाध्य आजारांवर उपचार शोधण्यासाठी डॉक्टर आणि वैज्ञानिकांना येण्याऱ्या खर्चाचा भर ते उचलत. स्कॉटलंडमध्ये लहानपणी त्यांना ऑर्गनवरील संगीत खूप आवडे. त्यांनी अमेरिका, कॅनडा आणि ब्रिटनमधील आठशेपेक्षा जास्त चर्चना ऑर्गनसाठी देणगी दिली. अँड्र्यु कार्नेगी आपल्या कर्मभूमीला कधीच विसरले नाहीत. पिट्सबर्गमध्ये दोन कॉलेज, एक आर्ट गॅलरी, म्युझियम, कॉन्सर्ट भवन आणि सिम्फनी ऑर्केस्ट्रा बांधण्यासाठी त्यांनी भरभरून धन दिले.






**हिरो फंडच्या पदकाची मागची बाजू “मनुष्याचे सर्वात उदात्त प्रेम म्हणजे आपल्या मित्रांसाठी प्राणाचीही पर्वा न करणे.”**



**कॅलिफोर्निया यूनिव्हर्सिटीमध्ये 'कार्नेगी पुरस्कृत ग्रंथालय' अर्पण केले तेव्हा उपस्थितांना संबोधित करताना अँड्र्यु कार्नेगी**

प्रचंड पैसा दान करूनही अँड्र्युकडे अजून भरपूर संपत्ती शिल्लक होती. त्यामुळे त्यांनी 'कार्नेगी कॉर्पोरेशन' स्थापन केली. अँड्र्युच्या मृत्यूपश्चातही कॉर्पोरेशनने शाळा, वाचनालये, वैज्ञानिक संशोधन अशा विविध कामासाठी सहाय्य केले. आजही चांगल्या कामासाठी कार्नेगी कॉर्पोरेशन आर्थिक मदत करत आहे.

अँड्र्यु कार्नेगीनी कोट्यावधी डॉलर दान केले. अनेक चांगल्या कामांना त्यांनी भरघोस मदत केली. परंतु जगभरात सुरु केलेल्या 'अँड्र्यु कार्नेगी वाचनालय' मुळे ते लोकांच्या मनात जास्त घर घरून राहिले.

पिट्सबर्गमध्ये गरीब टेलीग्राफ मेसेंजर म्हणून काम करत असताना वाचनालय सुरु करण्याची कल्पना त्यांना सुचली. कर्नल जेम्स अँडरसन नावाचे एक गृहस्थ नोकरी करणाऱ्या किशोरवयीन मुलांना आपल्या वाचनालयातील पुस्तके वाचायला देत. दर शनिवारी अँड्र्यु कार्नेगीसारखी मुले अँडरसन यांच्या घरी जात आणि आपल्या आवडीचे पुस्तक वाचण्यासाठी घरी घेऊन येत. ज्यांच्यामुळे चांगले वाचायला आणि चांगले शिकायला मिळाले त्या ह्या सद्गृहस्थांना अँड्र्यु कधीच विसरले नाहीत.

त्यामुळेच आयुष्यात स्थिरावल्यावर अँड्र्युनी वाचनालये बांधण्यासाठी भक्कम आर्थिक मदत केली. ज्या ज्या शहरांनी वाचानालायाची मागणी केली त्या त्या ठिकाणी 'अँड्र्यु कार्नेगी वाचनालय' उभारले गेले.

अँड्र्युची फक्त एव्हढीच इच्छा होती की लोकांना वाचायला नेता यावी यासाठी वाचनालयातली कपाटे पुस्तकांनी सदैव भरलेली असावीत.

जसजशी ह्या कामाची माहिती सगळीकडे पसरू लागली तसतशी अमेरिका आणि जगभरातून अँड्र्यु कार्नेगी वाचनालयाची मागणी वाढू लागली. कॅलिफोर्निया ते कॅनडा, ऑस्ट्रेलिया ते अलाबामा सगळीकडच्या मोठ्या आणि छोट्या शहरांमध्ये लोकांसाठी वाचनालये उभारण्याचे काम जोरात सुरु झाले. अँड्र्यु कार्नेगींनी एकूण २८११ वाचनालये बांधण्यासाठीचा पूर्ण खर्च उचलला.

११ ऑगस्ट १९१९रोजी अँड्र्यु कार्नेगींना शांत मरण आले. पण त्यांच्या दानशूरतेमुळे आणि अफाट कार्यामुळे लोकाच्या मनात आजही ते अमर आहेत.



अँड्र्यु कार्नेगीची तळमळ होती की त्यांना जशी पुस्तके वाचायला मिळाली तशीच सर्व मुलांनाही मिळावीत.







कार्नेगी वाचनालये जगभरात बांधली गेली. आज त्यातील काही वापरात नसली तरी बरीचशी आजही चालू आहेत.

# घटनाक्रम



| | |
|---|---|
| १८४५ | २५ नोव्हेंबर रोजी डनफर्मलाइन, स्कॉटलंड येथे अँड्र्यु कार्नेगीचा जन्म |
| १८४८ | कार्नेगी कुटुंबाचे पिट्सबर्ग, पेन्सिल्वेनिया येथे स्थलांतर |
| १८५० | टेलीग्राफ मैसेंजर म्हणून पहिली नोकरी |
| १८५३ | पेन्सिल्वेनिया रेलरोड कंपनीत थॉमस स्कॉट यांचे खाजगी सचिव म्हणून नेमणूक |
| १८५९ | पेन्सिल्वेनिया रेलरोड कंपनी पश्चिमी डिव्हीझनचे सुपरिन्टेन्डेन्ट म्हणून नियुक्ती |
| १८६१ | नागरी युद्धाची सुरुवात. वॉशिंगटनला यूनियन सेनेसाठी रेल्वे आणि टेलीग्राफ व्यवस्था सुरुळीत सुरु ठेवण्यासाठी मदत |
| १८६५ | नागरी युद्ध समाप्त |
| १८६५ | कीस्टोन ब्रिज कंपनीची स्थापना |
| १८६५ | पेन्सिल्वेनिया रेलरोड कंपनीचा राजीनामा. स्वत:च्या व्यवसायाची सुरुवात |
| .१८६७ | पिट्सबर्गहून  न्यूयॉर्क इथे स्थायिक |
| १८७३ | एडगर थॉमसन स्टील वर्क्सची स्थापना |
| १८८१ | कार्नेगी स्टील कंपनी सुरु |
| १८८७ | 22 एप्रिलला लूइसशी विवाह |
| १८९२ | होमस्टेड स्टील कामगारांचा संप. प्रामाणिक व्यक्तिमत्वला तडा |
| १८९७ | मार्गरेट, एकुलत्या मुलीचा मार्चमध्ये जन्म. |
| १९०० | कार्नेगी स्टील कंपनी विकून उर्वरित आयुष्य दानधर्म आणि सामाजिक कामाला समर्पित |
| १९११ | ११ ऑागस्टला मृत्यू |